ती मुलगी घेउन व आपला मुलगा त्याच्या स्वाधीन देउन ते दोघे घरी परत आले. तेव्हा कस आला व त्याने तिचे नाक दाबून तिला नकटें केले

**सा तपःस्था स्थिता विन्ध्ये व्याधजर्योऽगमद्दिवम् ।**
**हस्ताद्गुलीत्रयी तस्या क्रत्वाँड्विन्ध्यवासिनी ॥२३॥**

तिला गुप्त तळघरात वाढविली व मोठी झाल्यावर बाहेर काढली आपले विकृत स्वरूप पाहून ती लाजली व सुव्रतानामक अजिकेजवळ दीक्षा घेऊन तिने विंध्यपर्वतावर राहून तपश्चर्या चालविला शवटी तिला वाघाने खाल्ले तीन बोटे पडलेली होता ती पाहून तेथील जगली लोकाना आश्चर्य वाटले व त्याना विंध्यवाला देवी म्हणून त्या बोटाची पूजा सुरू केली

**पृष्टो दृष्ट्वा महोत्पातात्कसेन वरुणोऽब्रवीत् ।**
**जातस्तेऽरिरिति श्रुत्वा त व्यायन्यतनादिभि ॥२४॥**

एकदा मथुरेत नरेच उत्पात झाले नेव्हा वरुण नामक ज्योतिष्यानीं त्याला सागितले की, तुझा शत्रु निर्माण झाला आहे तें ऐकून पूतना वगैरे देवताना त्याच्या तपासण्यासाठीं त्याने पाठविले

**प्राक्सिद्धाभिस्तद्ववेष्टफलाभि.सप्ताभि श्रितः ।**
**स तांद्विरो विभङ्गेन त ज्ञात्वाथ विकृत्यं ताः ॥२५॥**

१ उद्भकायोत्सर्गेण स्थिता २ भक्षिता ३ व्याधजनपदैर्देवतेतिभणित्वार्चिता ४ अरिंचिंतयन्कस ५-पूर्वजन्म ६ कस ७ कसवचनेन ८ मिथ्यावाधिना ९ विक्रिया प्राप्ता ।

त्यानें पूर्वीच्या जन्मी प्रसन्न करून घेतलेल्या व या जन्मात इष्ट फळ देणाऱ्या याच देवता होत त्या सात देवतानीं मायारूपे धारण केलीं विभंगज्ञानानें कृष्णाला मात्र ओळखलें

मात्रन ककुभद्वन्द्वतालरासभिकार्वताः ।
जिघासन्त्यस्त्वाशक्ति कसमूचिरे ॥ २६ ॥

या सात देवानीं माता, गाडी अर्जुन वृक्षाची जोडी, ताल-वृक्ष, गाढव, व घोडा अशी क्रमानें रूपे धारण करून कृष्णाला मारण्याचा प्रयत्न केला पण त्यात त्या असमर्थ ठरल्या त्यानीं कंसास येऊन तसें सांगितलें

द्रष्टुं स्वविक्रम हन्तु रौद्रकृष्णवृषाकृते ।
आयातोऽरिष्टदेवस्य जातु ग्रीवा बभञ्ज स ॥ २७ ॥

आपला पराक्रम दाखविण्यासाठीं अरिष्टदेव काळ्या बैलाचें रूप घेऊन कृष्णाला मारण्यास आला पण कृष्णानें त्याची मान मोडून टाकली

तच्छ्रुत्वा गोमुखीनामग्पवासछद्मनाथ तम् ।
पितरौ स्मार्चतो सिश्चद्वलश्चाम्बा क्षरत्कुचाम् ॥२८॥

देवकीवसुदेवानी त्याच्या पराक्रमाच्या वार्ता ऐकून गोमुखीं उपवास केल्याच्या मिषाने गवळ्याचे घरा ते आले तेथें त्यानीं त्याची

१ यशोदारूपेण विषस्तनी माता २ स हतुमसामर्थ्यमस्माक ३ हरि पराक्रम ४ वृषग्रीवाभजन ।

पूजा केली तेव्हा देवकीच्या स्तनातून आपोआप दुग्धधारा पडल्या

**गोवर्धनमहावृष्टौ छत्रीचक्रेऽयदा गवाम् ।**
**सोऽहिशय्याधनुःशंखवान्पूर्वदेवैगृहजान्स्वयम् ॥२९॥**

एकदा अतिवृष्टि झाली असता कृष्णानें गोवर्धन पर्वताचीच छत्री करून गायींचें रक्षण केलें मथुरतील प्राचीन जिनालयाजवळील ग्रामदेवतेच्या मंदिरात अहिशय्या, धनुष्य व शंख ही तीन रत्नें कृष्णाला दिसली

**दृष्ट्वा साध्यान्ददाम्येषा साधयित्रे सुतामिति ।**
**कंसे तद्घोषितेऽसौ तान्यान्वनोऽसाधयन्महान् ॥३०॥**

त्या अहिशय्येवर चढून जो कोणी धनुष्याला बाण लावील व शंख वाजवील त्याला मी माझी मुलगी देईन तेव्हा स्वर्भानु राजाचा मुलगा भानु याच्या नावानें कृष्णानें त्या तीन्ही गोष्टी केल्या ज्यानीं प्रत्यक्ष पाहिलें होतें ते म्हणू लागले कीं हें भानूचें काम नसून दुसऱ्या कुमाराचें आहे तेव्हा कंसानें त्या कुमाराला शोधून आणण्याची आज्ञा केली

**तत कंसभयान्नंष्ट्र गोष्ठे येनाप्यनुद्धतम् ।**
**तत्रोद्धृत्य हरिं शैलस्तंभ लेभे जनाशिषः ॥ ३१ ॥**

त्या आज्ञेमुळें भिऊन नंदगवळी गाव सोडून गेला ज्याठिकाणी ते जाऊन राहिले तेथ एक दगडी खांब होता तो कोणीहि उचलू शकत नव्हते तो कृष्णाने उचलला व सर्वांची शाबासकी मिळविली

१ मथुरास्थापनार्थं जिनाल्याते पूर्वादिशि पुरदेवतागृहे समुत्पन्नान् ।

प्रत्यागते व्रजे भक्त्वा महानाग पितृगिरा ॥
कस सहस्रपत्राणि ससरोजान्युपाहरत् ॥ ३२ ॥

काहीं दिवसानीं नदगवळी स्वग्रामीं परत आला तेव्हा त्याला छळण्यासाठीं कालियसर्प ज्याची राखण करतो ते सहस्रकमळ आणून दे अशी आज्ञा कसाने केली नदाच्या आज्ञेनें कृष्णनें नागास जिंकून तेहि आणून दिले

अथाहूतो नृपेणामामल्लैर्नन्दो व्रजन्गजम् ।
भक्तोत्खातरदाहत्य कृष्णेनोक्तजयो द्युतत् ॥३३॥

आपल्या मल्लासह एका कुस्तीसाठीं येण्यास नदगवळ्याला कसानें आज्ञा केली त्याप्रमाणे काहीं मल्ल व कृष्णासह तो मथुरेत प्रवेश करीत असता त्याच्यावर मदोन्मत्त हत्ती सोडण्यात आला कृष्णाने त्याला त्याचाच दात उपटून त्या दातानेंच मारलें

गत्वासभा नियुद्धेऽसौ त प्रायुक्त नृपाज्ञया ।
सोऽपि रङ्ग प्रविश्यर्द्धा चाणूर कसमप्यहन् ॥ ३४

मल्लाचे आखाड्यात ते गेले चाणूराशीं कृष्णाची कुस्ती जुपली एका क्षणात त्यानें त्याला चीत्त केले तेव्हा स्वत कस द्वद्वयुद्धास सज्ज झाला कृष्णानें त्याला कुस्तींत ठार मारून टाकले

स नाकिमुक्तपुष्पौघैविपाश्य यापित्तरौ वरै ।
नम्रैर्नृपैर्वृत प्रीतै स्वैश्च सूर्यपुर ययौ ॥ ३५ ॥

१ कालीयनाग २ नीतवान्कस प्रति ३ दतेन ४ व्यक्त झटिति वा ५ नाकिभिर्देवै ६ बधन छित्वा ७ स्वजातिभि ।

सर्व देवानीं त्यावर पुष्पवृष्टि केली त्याने आपल्या माता-पिताना बंधमुक्त केले अनेक मांडलिक राजे व आपल्या नातलगां-सह तो सूर्यपुरास गेला

**तज्जीवद्यशस. श्रुत्वा ध्वंतान्हन्तु यदूंन्सुतान् ।**
**ज्ञात्वा चक्री जितान्कालयवन प्राहिणोत्स्वजम् ३६**

जीवयशेने जरासंधाला कंसवधाची हकीगत सांगितली तेव्हा त्यानें अपराजिताला व आपल्या मुलाना भारी सेनेसह पाठविले पण पराजित झाला असे ऐकून कालयवनाला त्यानें पाठविले

**श्रुत्वायान्तमजय्य त गत्वाब्धौ यादवा स्थिताः ।**
**प्रदीप्याग्नि पृथु मास्थान्मार्गे तत्कुलदेवता.॥३७॥**

कालयवन चाइन येत आहे असे ऐकून सर्व यादव सूरीपुर हस्तिनापुर, मथुरा वगैरे गाव सोडून समुद्रकिनारी गेले कालयवन यांच्या मागे लागला तव्हा यादवांच्या कुलदेवतेने म्हातारीचे रूप घेऊन खूप दावा ल पेटविला आणि ती म्हातारा वाटतच बसली कालयवनाने हा काय प्रकार आहे म्हणून विचारल्यावर तुझ्या भीतिने माझ्या यादवपुत्रानी ग्रामयाग करून स्वत ला जाळून घेतले आहे त्याचा हा दावानळ आहे असे उत्तर दिले

**वृद्धा मत्पुत्रयदेव प्रविश्याग्नि भयान्मृता**
**इत्युक्तोऽग्निस्तयाहयुर्गत्वा तात तथावदत् ॥ ३८ ॥**

१ कसवधाधिक प्रहितान् २ पुत्र ३ वृद्धा आह मत्पुत्रा यादवाश्च अथवा हे मत्पुत्र हे कालयवन ४ विघटयति स्म।

ह्यातारीच्या त्या बोलण्यावर विश्वास ठेवून कालयवन परतला व जरासंधाला त्यानें अभिमानानें आपल्या दराऱ्याचें वर्तमान सांगितलें

कृष्णःकृताष्टोपवासो वासायोपाब्धिनैगमम् ।
आरूह्याश्वाकृतिमेन सिन्धुं सोऽखण्डयत्सुरेट् ॥३९॥

कृष्णानें समुद्रकांठीं आठ दिवसांचें अनशनव्रत आचरलें तेव्हां नैगमदेवानें येऊन त्याला सांगितलें कीं, घोड्याच्या आकाराचा एक देव येईल त्यावर बसून तूं समुद्रांत बारा योजनें जा. तुझ्यासाठीं तेथें एक नगरी बनेल त्याप्रमाणे अश्वरूपी देव आल्यावर कृष्ण त्यावर स्वार होऊन समुद्रांतून गेला त्यामुळें समुद्र दुभंगून एक बेट बनलें

तत्र शक्राज्ञया यक्षश्चक्रे द्वारवतीं पुरीम् ।
वसतस्तत्र कृष्णादीन्नमिकल्याणिकोर्जितान् ॥४०॥

इंद्राच्या आज्ञेवरून कुबेरानें त्या बेटावर द्वारकानगरी वसविली तेथें कृष्णादि यादव रहात असतांना नेमिनाथ तीर्थंकराचीं गर्भ व जन्म कल्याणिकें झालीं

कुरुवंशे हास्तिनेशाज्जातो व्यासः पराशरात् ।
तत्पुत्रो धृतराष्ट्रोऽन्य' पाण्डुश्च विदुरोऽपरः ॥४१॥

हस्तिनापुरात कुरुवंशाचा शक्ति नामक राजा राज्य करीत होता त्याला शतकी नामक राणीपासून पराशर नामक मुलगा

१ सुरस्य सदयचरस्य देवस्य स्वामी हरि २ सत्यवतीगर्भे ।

झाला. त्याचा मुलगा व्यास व्यासाला सुभद्रा नामक स्त्रीपासून धृतराष्ट्र पाडु व विदुर असे तीन पुत्र झाले

धृतराष्ट्रो नरपतिर्वृष्णिपुत्र्यां शत सुतान् ।
दुर्योधनादीन्गान्धार्यां स्यातैर्वीर्यानजीजनत् ॥४२॥

वृष्णि राजाची मुलगी गाधारीपासून धृतराष्ट्र राजाला दुर्योध-नादि शभर मुलगे झाले

काममुद्राधरे पाण्डौ कन्या कुन्ती गैते रह ॥
जातमुद्धृत्य कालिन्द्या' कर्णं चम्पाधिपाऽपुपत् ॥४३

वज्रमाली नामक विद्याधर हस्तिनापुराजवळ वनक्रीडा करीत असता आगठी हरवला व ती पाडूला सापडली पाडूने त्याला ती दिली तेव्हा ही आगठी जवळ असली ह्मणजे वाटेल तेव्हा गुप्त होता येते असें विद्याधराने त्याला मागितले तिचा उपयोग करून कुतीनामक कुमारीशीं पाडू अदृश्यपणे सभोग करून आला मुलगा जन्मल्यावर त्याच्या कानात कुडल घालून पेटींत पत्रासह ठेउन ती यमुना नदींत सोडून देण्यात आली चपापुरचा राजा आदित्य यास ती पेटी सापडली त्या बाळकाच पालनपोषण केलें

युधिष्ठिरादीन्सोऽनूढ्वा तापसान्धकवृष्णिजाम् ।
त्रीन्कुन्त्या मद्र्या नकुल सहदेवस्तुजोऽसृजत् ॥ ४४ ॥

१ व्यासस्य पुत्रा सुभद्रागर्भज २ गाधारानाम्न्या ३ उग्रसेन देवसेनमहासेनानुजाया । ४ उपभुक्तवात ५ कुडलरत्नकवचलेखपत्र युक्त मञ्जूषाया क्षिप्त कुन्तीपरिजनै ६ राधाकर्णाभङ्गादादित्येन चपाधिपेन कृत कर्ण सज्ञ चापुषत् राधाख्यायै स्वपत्न्यै दत्वाऽपुषत् ७ पुत्रानेव पञ्च असृजत् अजीजनत् ।

पुढ पडु राजाचा विवाह त्याच अधकवृष्णीच्या कुतीनामक मुलीवरोवर झाला व तिच्यापासून त्याला युधिष्टिर, अर्जुन व भीम असे तीन आणि कुनीपासून नकुळ व सहदेव झाले

**दर्याधनादयो व्याज जरासधमथाभजन् ।**
**युधिष्ठिरादय कृष्ण विपक्षक्षपणोद्यतम् ॥ ४५ ॥**

दुर्योधनादिकानीं कपटी जरासधाचा पक्ष घेतला व युधिष्ठिरा दिकानीं शत्रूचा नाश करण्यास उद्युक्त झालेल्या कृष्णाचा पक्ष घेतला.

**मागधै.सन्मणीन्राजगृहे वाणिज्योपदर्शितान् ।**
**ते चक्रिणेते क प्राप्ता इति पृष्टा जगु प्रभा ॥ ४६ ॥**

मगधदेशातील काहीं वश्य समुद्रमार्गानें व्यापार करीत असता द्वारकेस आले व तेथील वैभव पाहून चकित झाले तेथे त्यानीं रत्नमाणिक्याची खरेदी केली व स्वदेशा परत गेले. जरासधराजाला तीं रत्नें त्या व्यापाऱ्यानीं दाखविली व हा कोणत्या देशातील आहेत अस त्यानें विचारलें असता ते म्हणाले

**मन्येऽब्धिद्वारवत्यास्ते दिव्या यदुसभर्तृका ।**
**तत्रं वायुवशात्प्राप्तैर्दृष्टास्माभिरर्थार्जिता ॥ ४७ ॥**

आम्हीं नेहमींच्या मार्गानें प्रवास करीत असता वाऱ्यानें भलतीकडे नेले गेलो तेव्हा आम्हा द्वारावती बेटास लागलें हें बेट राजा

१ मगधदशजे सायानिकै २ यदुना हरिणा सभृर्तका सनाथा। ३ अ गो।

कृष्णानें सनाथ केलें आहे ते फार भरभराटींत आहे तेथून आम्ही हीं रत्नें आणली

**श्रुत्वैतत्प्रभुग क्रुद्धो युष्मान्प्रत्याह दर्पदानं ।**
**इति नारदाचारोक्त्या ज्ञात्वा यात निषदितुर्मु ॥ ४८**

यादवांचें नाव ऐकल्याबरोबर जरासंध चिडला व तें वैभवशाली वर्णन ऐकून नर त्याचा नाश करण्यासाठी एकदम निघाला. नारदानीं तो चालून येत असल्याचं वर्तमान कृष्णाला सांगितलें माझ्या जावयाला मारून पळून जाऊन लपून बसलेले असून वेभवाचा टोळ मिरविणारे मरतवाळ हे यादव आहेत असें जरासंध ह्मणाल्याचेहि नारदाने कृष्णाला सांगितले

**यामोऽरिं रन पुरीमेता रक्षेति स्ववचं स्मृ‍े ।**
**ॐ मित्युक्तवत.स्मित्वा नेमेर्ज्ञात्वा जय ि भतात् ४९**

या नगरीवर शत्रु चालून येत आहे त तिचे रक्षण कर असें श्रीकृष्ण नेमिनाथाना ह्मणाले तेंहा ते आम् ह्मणून हसले. त्यावरून आपणाला जय मिळणार असें त्याना वाटलें

**कुरुक्षेत्र गत क्षि । स्वर्यैलैरपरैररिम् ।**
**हत्वा तन्मुक्तचक्रेण जितारिरविशर् ीम् ॥ ५० ॥**

आपले व मित्रराजाचे सैन्य एकत्रित करून कृष्ण कुरुक्षेत्राला गेला तेथें घानोर युद्ध झाले जरासंधानें सोडलेल्या चक्रानेंच

---

१ भजमानर हत्वा भगण्प्यारमोपने स्थितत्वा भव्यागर्विण चर्का इत्यादि २ हतु ३ स्वस्थनाने भातु ४ पाडवादिसैन्यै ५ जरासधमुक्तचक्रेण

त्याला कृष्णानें मारलें. याप्रमाणें जय–मिळवून त्यानें नगरींत प्रवेश केला.

चक्रशक्तिगदाशङ्खधनुर्दण्डासयो हरे
रुक्मिण्याद्यष्टदेव्यः[१]स्त्रीसहस्राणि षोडश ॥ ५१ ॥

चक्र, शक्ति, गदा, शंख, धनुष्य, दंड, तलवार वगैरे श्रीकृष्णाचीं दिव्य अस्त्रें होतीं रुक्मिणी त्याची पट्टराणी असून त्याला सोळाहजार स्त्रिया होत्या

रत्नमालागदासीरमुशलान्यथ सस्मित ।
देव्यश्चासन्बलस्याष्टौ[२] मिथ प्रीतौ सुख स्थितौ ॥५२

रत्नमाला, गदा, नांगर, मुसळ, ही बल्देवाचीं आयुधें होतीं त्याला आठ हजार स्त्रिया होत्या ते सुखानें एकमेकावर प्रेम करीत काळ घालवीत होते

जात्वद्धान्ते[३] जलक्रीडामनोहरसरोवरे ।
सङक्रान्तेर्यादवैश्चक्रे तत्राभून्नेमिभामयो[४] ॥ ५३ ॥

एकदा सर्व यादव मनोहर सरोवरांत जलक्रीडा करण्यास गेले. तेथ नमिनाथ व सत्यभामा याचा मनोहर संवाद झाला

सल्ल प सेचनाद्दन्ते[५] स्नाहीद क्षालयेति वाक्[६] ।
सत्यभामा प्रतिस्नानवस्त्र नेमि स्वमाक्षिपत् ॥ ५४ ॥

१ अष्ट महादेव्य स्त्री पत्नित्वा वा २ बलभद्रस्याष्टौ सहस्राणि ३ शरत्काल ४ नामैत्त् ५ जलक्रीडानन्तरे ६ उक्त्वा ।

**पाण्यप्सकक्षणेऽन्येद्युःस्वराज्ये नाशशङ्कया ।**
**मृगानारुध्य वृत्त्या ता शिक्षयित्वा स रक्षकान्॥५८**

पाणिग्रहणाचे वेळीं दुसरे दिवशीं कृष्णाला अशी शंका आली कीं, नेमिनाथ आपल्या राज्याचे वाटकरी होतील म्हणून शिकाऱ्याकडून पुष्कळ पशु मेजवानीच्या मांसासाठीं त्यानें आणविले ही हिंसा पाहून नेमिनाथ सन्यास घेतील अशी त्याला खात्री होती पशु कशाला आणले म्हणून त्यानीं विचारल्यास मारून त्याच्या मांसाची लग्नानिमि मेजवानी देण्यासाठीं ते आणले आहेत असें स्पष्ट उत्तर देण्यास कृष्णानें रक्षकाना शिकवून ठविलें

**त्वद्विवाहे व्ययीकर्तुं कृष्णेनैते इति ।**
**ते॰ प्रत्यालापयन्नेमिं यातमालोकितु दिश ॥ ५९ ॥**

दिशावलोकनासाठीं नेमिनाथ पालखींत बसून चालले असता ते हरिण पाहून त्यानीं विचारले व कृष्णानें शिकविल्याप्रमाणें रक्षकानीं उत्तर दिलें

**ज्ञात्वा तच्छद्म निर्विद्य संस्मृत्य स्वपुराभवान् ।**
**शोकार्तामविकांशुक्त्वा स राजमतिराजक ॥ ६० ॥**

कृष्णाच कपट नेमिनाथानीं ओळखलें व वैराग्य पावून स्वत च्या पूर्व जन्माचें स्मरण केले दुःखी मातेला उपदेश करून राजी–

१ हस्तोदकवचनसमय २ उत्तरमकारयत् ३ गत सत ४ राजिमत्या राजसहस्रेण च सहित ।

मति रडत आहे असें पाहून तिलाहि बरोबर घेतलें व हजारो राज-पुत्रासह दीक्षा घेतली

सहस्राम्रवने श्रित्वा तप षट्पञ्चवासरान्।
नीत्वोर्जयन्ते कैवल्य प्राप्य मोह विहत्य सः ॥६१॥

ते सहस्राम्रवनात जाऊन राहिले व पासष्ट दिवस त्यानीं अनशन व्रत आचरलें, पारणें केल्यावर त्याना कैवल्यज्ञान झालें, यानीं मोहाचा नाश केला

प्राप्तो रैवतकोद्यान कृष्ण तत्त्वमबूबुधत्।
देवकीसत्यभामाद्या गणीडिष्टा कथा निजाम् ॥६२॥

रैवतकउद्यानात येऊन त्यानीं कृष्णाला तत्वोपदेश केला देवकी, सत्यभामा वगैरे स्त्रियानीहि येऊन गणधराना त्यानीं आपापली भवावली विचारली

प्रद्युम्नादि भवान्पृष्ट्वा ज्ञात्वा पृष्टो हरे कियत्।
राज्य भावीतितत्प्रेम्णा सीरिणा नेमिरब्रवीत् ॥६३॥

प्रद्युम्नाची भवावली विचारून ऐकल्यावर हरीच्या प्रेमानें बलदेवानें नेमिनाथाना प्रश्न विचारला कीं हें हरीचें राज्यवैभव किती दिवस टिकेल तेव्हां ते ह्मणाले

द्वीपायनस्तपो लात्वा प्रेत्यै प्रत्यॆत्यधक्ष्यति।
द्वारकां द्वादशाब्दान्ते मत्तयादवकोपित ॥ ६४ ॥

१ गणीशा श्राविता २ हरिस्नेहेन ३ देशातर गत्वा पश्चादागत्य।

बारावर्षानंतर मद्यपानानें मदोन्मत्त झालेल्या यादवांकडून राज्य नष्ट होईल द्वीपायन तप आचरून यादवामुळे कोपित होऊन द्वारकानगरी जाळून टाकील

हरि जरत्कुमारोऽपि कौशाम्बीगहनान्तरे ।
सुप्त तृषार्त वनैण भ्रान्त्या सद्यो हनिष्यति ॥६५॥

कौशाम्बी जवळील गाढ काननात कृष्ण ता हेने व्याकुळ होऊन निजला असता जंगली हरिण समजून जरत्कुमार तात्काळ त्याला ठार मारील

एतच्छ्रुत्वाप्तनिर्वेदा विद्वांस' स्वाम्यनुज्ञया ।
प्रद्युम्नरुक्मिणीमुख्या मोक्षीं दीक्षामशिश्रयन्॥६६

वरील भविष्य ऐकून शहाण्यांना वैराग्य उत्पन्न झाले व प्रद्युम्नादि मुले व रुक्मिणी वगैरे स्त्रियांनीं मोक्षपददायी दीक्षा स्वामींच्या म्हणजे कृष्णाच्या आज्ञेने घेतली

सम्भवश्चानिरुद्धश्च तन्नाश वेक्ष्य दीक्षितौ ।
प्रद्युम्नश्चाथ निर्वाणा गिरनारीकूटगा ॥ ६७ ॥

द्वारकेचा नाश होणार हे पाहून संभव व अनिरुद्धानेंहि दीक्षा घेतली व प्रद्युम्नासह ते गिरनार पर्वतावर मोक्षाला गेले

रुक्मिण्याद्या सुसत्स्यन्ति प्रोऽच्युतास्तपसाऽच्युत' ।
धर्मातोऽनैत्य माहेन्द्राद्बलस्तीर्थं करिष्यति ॥ ६८ ॥

७ द्वारावतीदाहारिक ।

रुक्मिणी वगैरे स्त्रिया अच्युत नामक स्वर्गातून येऊन, नंतर मोक्षाला जातील बलदेव माहेंद्र स्वर्गातून येऊन व कृष्ण प्रथम नरकातून येऊन तप करून येथे तीर्थ बनवितील अर्थात् तीर्थंकर होतील.

नेमि पुनर्विहृत्योर्वी पल्लव देशमास्थितः।
अथ भारतसंक्षेपो लाक्षावेश्ममवेशिता ॥ ६९ ॥

नेमिनाथ पुढें विहार करीत पल्लव देशांत गेले भारत संक्षेपानें असें आहे पांडव लाक्षागृहांत कुरुकडून वैरामुळे टाकले गेले

कुरुभि रादजारित्वानिर्गत्यातःसुरंगया।
सापंडानन्तु द्रौपद्या, कम्पिल्यायां स्वयंवरम् ॥७०॥

पण कपट ओळखून सुरंगाच्या रस्त्यानें पांडव लाक्षागृहांतून निसटले व अद्भुत कर्म करून त्यांना कंपिला नगरींत प्रवेश केला

प्रविष्टा पाण्डवास्तत्र विद्धराधो युवाँनृप।
तत पार्थात्सुभद्रायामभिमन्युरसौत्सुत. ॥ ७१ ॥

तेथे त्यांनी स्वयंवरमंडपांत प्रवेश केला व अर्जुनानें राधावेध (मत्स्यभेद) करून द्रौपदी मिळविली एवढ सुभद्राहरण अर्जुनानें केलें व तिच्या पासून त्याला अभिमन्यु नामक मुलगा झाला

द्रौपद्यामिगपुमाँनाथ सूनवोऽन्वभवन्क्रमात्।
देशानिमान्क्षितिगुप्त भ्रान्त्वा दर्शितविक्रमा ॥७२॥

१ दुर्योधनाद्यै २ हस्तिनागपुरस्थितेन विदुरेण कुद्दालकरान् प्रस्थाप्य नगरा न्दहिल्लाक्षागृहनिर्मापण व्याजेन निर्मापितया सुरंगया ३ अद्भुतकर्मणासह प्रविष्टा ४ द्रुपदस्य दृढरथाया पुत्र्या ५ अर्जुन ६ प्रसूत स्म ७ पंच प्रमाणा ८ भूमौ प्रच्छन्न यथाभवति तथा।

अर्जुनापासून द्रौपदीलाहि क्रमानें पाच मुलगे झाले सर्व देश अज्ञातवासात हिंडून पाच पांडवानीं पराक्रम प्रगट केला.

**द्यूत रन्त्वा धर्मपुत्रो दुर्योधनमहीभुजा ।**
**जित्वा कुरून्कुरुक्षेत्रे श्रित्वापाग्मधुरामथुं ॥ ७३ ॥**

दुर्योधन राजा बरोबर धर्मराजा द्यूत खेळला व हरला ह्मणून तो अज्ञातवास प्राप्त झाला होता पण त्यानंतर कौरवाना जिंकून त्यानीं दक्षिणमथुरेत वास केला त्यानी पुष्कळ देशातून भ्रमण केलें.

**श्रुत्वा द्वारवतीदाहाद्याप्य निर्वेदमर्हतं ।**
**ज्ञातजन्मान्तरास्ते निर्ग्रन्था शत्रुञ्जये स्थितो ॥७४॥**

द्वारका भस्मसात् झालेली ऐकून त्याना वैराग्य प्राप्त झाले व नेमिनाथाकडून आपली भवावली ऐकून ते निर्ग्रंथ मुनि झाले व शत्रुंजयावर गेले

**द्विट्स्वस्त्रियोंहतास्तप्तलोहभूषा वितेपिरे ।**
**कौन्तेयास्तेप्यगुः सिद्धिं माद्रेयौ त्वतिमां दिवम् ७५**

तेथें ते तपश्चर्या करीत असता दुर्योधनाचा भाचा आला व त्याने तापलेल्या लोखंडाची राजभूषणें त्याच्यावर घातलीं तरी त्यानीं ध्यानावस्था सोडली नाहीं त्यामुळें कुंतीचे तीन पुत्र सिद्ध-पदाला गेले व माद्रीचे दोन पुत्र अनुत्तर पाचव्या सर्वार्थसिद्धि नामक स्वर्गांतील विमानात देव झाले

१ दक्षिण मथुरा २ प्रतपति स्मके पाडवा किं कृत्वा देशा भ्रान्त्वा. ३ नेमे समीपात् ४ आतापनयोगेन स्थिता ५ दुर्योधनभागिनेय कुर्युवराख्य.

**कुन्तीसुभद्राद्रौपद्योनिर्वास्यत्यच्युताच्च्युता ।**
**प्राग्बद्धनरकायुष्कः कृष्णोऽनुमात्तशुद्धदृक् ॥ ७६ ॥**

अच्युत स्वर्गातून आलेले कुंती, सुभद्रा, द्रौपदी वगैरे स्त्रियाचे जीव मोक्षाला जातील, नरकातील आयुकर्म बांधलेला कृष्णाचा जीव भावापासून म्हणजे नेमिनाथाजवळून शुद्ध सम्यक्‌दृष्टि प्राप्त करून घेता झाला व तीर्थंकर नामकर्माचा बंध करून प्रथम नरकात जन्मला

**भ्रातुराप्तान्त्यनामागात्स्वभ्रं तच्छत्रुरप्ययात् ।**
**नेमौ सिद्धेऽथ साकेते चूलाया ब्रह्मणो नृपात् ॥९८**

त्याचा शत्रु जरासंध सुद्धा मरून तेथेंच गेला नेमिनाथ सिद्धपदाला गेले नंतर अयोध्येंत ब्रह्मराजा व चूलाराणीचा मुलगा ब्रह्मदत्त चक्रवर्ती झाला

**स्वर्गादेत्य सुर कश्चित्ब्रह्मदत्त सुतोऽभवत् ।**
**स भूत्वात्रातिमश्चक्री प्राविक्षत्सप्तमीं क्षितिम् ॥९९**

तो स्वर्गातून येऊन चक्रवर्ती बनला होता व मेल्यानंतर सातव्या नरकात गेला

**सुभानु प्राग्‍द्युजश्चित्रांगद खटोऽर्द्ध तुर्यभू ।**
**शङ्खो महाशुक्रसुर सीरी माहेंद्रजो जिनेट ॥ १००**

सुभानु पहिल्या स्वर्गातील देव, चित्रांगद विद्याधर, चोथ्या

१ नेमेरुपदेशात्प्राप्तसम्यक्त्व २ जरासंघ ३ सौधर्मजा देव ४ स्वर्गचतुर्थमाहेंद्रदेव ।

स्वर्गातील देव, शंखश्रेष्ठी, महाशुक्र विमानातील देव इतकी भवानली फिरून बल्देव झाला आता तो महेंद्रस्वर्गांत आहे पुढें तीर्थकर होईल

अमृतरसायनपलपचतृतीय नरकोद्भवश्वान ।
यशोभूनिनामा महादिशुकाऽच्युतोऽथ रामोर्हन् १०१

अमृतरसायन स्वयंपाकी, तिसऱ्या नरकातील जीव, यक्ष नावाचा मनुष्य, निर्नामा, महाशुक्र विमानातील देव अशी भवावली भोगून कृष्णाचा जीव नरकात गेला व पुढें तो तीर्थकर होईल

॥ इति श्रीनेमिजिना रपद्मकृष्णजरासन्धब्रह्मदत्तचक्री चरितोत्तर द्वाविंशम् ॥२२॥

---

पादनेऽरविन्दस्य राज्ञो मन्त्री वरद्विज ।
मरुभूतिरभूद्राज्ञा सहप्राप्तागमश्चिरात्[३] ॥ १ ॥

या जंबुद्वीपात दक्षिणभरतक्षेत्रात पोदनपुरच्या अरविंद नामक राजाचा मरुभूति नामक ब्राह्मण मंत्री होता राजासह त्यानेहि आगमाचे ज्ञान मिळविलें होतें फार पूर्वापासून तो त्याचा मंत्री होता

रक्त वरुणयां ज्येष्ठे स्वभ्रातृकमठे स्त्रिया
वसुन्धरीं भवरकान्ता तद्भ्राता भजतीति स ॥ २ ॥

१ जंबूभरत २ श्रुतिस्मृतिशास्त्रविदित्यर्थ राजापि प्राप्तागम ३ दीर्घकालपर्यंत ४ कमठभाय ५ कथित ।

त्याला कमठ नामक भाऊ होता त्याच्या स्त्रीचें नाव वरुणा व मरुभूतीच्या भार्येचें नाव वसुवरी होतें कमठाचे प्रेम वसुवरीवर होतें व तिच्याशी तो रममाण होऊं लागला तुझा भाऊ तुझ्या भार्येला भोगतो असें वरुणेनें मरुभूतीला सांगितले

तामाश्वास्यान्यदा छन्नो दृष्ट्वा तच्चेष्टितं स्वयम् ।
विज्ञाप्येशं विगोप्यासौ तं शठं निरवासयत् ॥ ३ ॥

तिला योग्य आश्वासन देऊन मरुभूतीनें स्वतः लपून वमून त्याच्या प्रेम चेष्टा पाहिल्या व राजाला सांगून कमठाला हद्दपार करविलें

गत्वोर्वसिंधु पञ्चाग्नितप कुर्वन्स मोहत ।
तेनान्यदा स्वनृपेणोवाच्याश्रित्य प्रणामिना ॥ ४ ॥

सिंधू नदीजवळील तापसपल्लीत शिवतप व्याजवळ जाऊन कमठानें पचाग्नि साधन केलें मरुभूतीनें पुन्हा राजाला विचारून कमठाचा आश्रय घेतला त्याची तो नम्रता करीत असे

प्रसाद्यमानस्त क्रोधाज्जघान शिलया तत ।
मलयें कुब्जकारण्ये स जात• सल्लकीवने ॥ ५ ॥

एकदा मरुभूति त्याचे पुढे नमून प्रार्थना करीत असता पूर्व-वैर स्मरून, क्रोधाविष्ट होऊन कमठानें त्याला दगडानें ठेचून मा-

प्रच्छन्ना मरुभूति २ खरारोहणोच्छिष्टरावमालागलारोपणादिक कार्यित्वा ३ निर्द्धाटित ४ नदीतीरे तापसपल्ल्या शिवतापससमीपे ५ अज्ञानात् ६ मरुभूतिना ७ निजनृपस्य पयंविला ८ तं कमठं आश्रित्य ९ प्रणामोस्यास्तीति प्रणामी तेन प्रणामिना प्रणतवता १० मरुभूतिं ।

रले, तेव्हा मेल्यावर तो मलयपर्वतावरील कुब्जक नामक सल्लकी वनात हत्ती झाला

वज्रघोषो गजेन्द्रोऽस्य वशासीद्वरुणा प्रिया ।
सार्थेनामारविन्दश्च यान्त सम्मेदमर्हत ॥ ६ ॥

त्याचे नाव वज्रघोष होतें वरुणा मेल्यावर पूर्वप्रेमामुळें हत्तीण बनून त्याच्याजवळ राहिली श्रावक सघावरोवर सम्मेदशिखराला यात्रेस जाता जाता अरविंदराजानें मुनि झाल्यावर त्याच वनात मुक्काम केला होता

वन्दितु तत्सरस्तीरे प्रतिमायोगमास्थितम् ।
सार्थं भक्त्वा हन्तुकामो वत्से श्रीवत्सलाञ्छनम्॥७॥

त्या वनातील तळ्याजवळ मुनि झालेला अरविंद राजा प्रतिमायोग धारण करून घ्यानस्थ बसला असता वज्रघोष हत्ती सघ विध्वस्त करून त्याला मारण्यासाठीं आला तेव्हा त्याला मुनीचे छातीवरील श्रीवत्सलाछन दिसले

तस्य दृष्ट्वांजसा जातिस्मरो स्नेहोद्बभूव स. ।
तेन प्रबोधितो धर्मं श्रावकव्रतमग्रहीत् ॥ ८ ॥

तें चिन्ह पाहून त्याला पूर्वजन्माचे स्मरण झाले व राजभक्तीमुळे त्याला मारण्याचे विसरून त्याच्यापुढें सोंड नमवून तो बसला घ्यान उतरल्यावर अरविंदमुनीनें त्याला श्रावकव्रतें दिलीं

१ हस्तिनी २ सल्लकीवनस्थ ३ वक्षसि ४ स्वामिस्नेहेन ।

**तदाभ्यत्यघाद्भिभ्यद्ग्ना शाला परैर्द्विपैः।**
**शुष्काणि तृणपत्राणि खादन्विध्वस्तमम्बु च ॥९॥**

तेव्हापासून पापभयानें तो हत्ती जलक्रीडा करीना व वनहि उध्वस्त करीत नसे इतर हत्तींनीं पाडलेला पाला पाचोळा व अचित्त पाणी तो पिऊन श्रावकव्रत पाळीत असे

**पारणाया पिनन्क्षीणः पातु वेगवतीं चिरात्।**
**पङ्कमग्न. समुद्धर्तुं यतमानोऽप्यशक्नुवन् ॥ १० ॥**

एकदा अनशन व्रत आचरल्यावर पारणे करण्यासाठी तो वेगवती नदीतीरीं आला व चिखलात रुतला फार अशक्त झाला असल्यामुळें बाहेर निघण्यासाठीं खूप धडपड केली तरीहि तो निघू शकला नाही

**मृतो दष्ट्र कुक्कुटाहीभूतेन कमठेन च।**
**सहस्रारे सुख भुक्त्वा स त्रिलोकोत्तमे पुरेम् ॥११॥**

कमठाचा जीव मरून कुक्कुट सर्प झाला होता त्यानें पूर्व वैर स्मरून हत्ताला दंश केला त्यामुळे तो मरून सहस्रार स्वर्गांतील देव बनला

**जातोऽत्र पुष्कलावत्याममिवेग खगोऽन्यदा।**
**सं तपस्यन्हगिगिरेर्गुहाया केवलीकृत ॥ १२ ॥**

स्वर्गातून तो जंबूद्वीपात विदेहक्षेत्रात, पुष्कलावती देशात,

---

१ उपलास्फालनाद्यपगजघट्टनाद्यप्रासुकीभूत २ अग्निवेग ३ के मस्तके वल्मीकृत वेष्टित मिलित इत्यर्थ।

विजयार्धपर्वतावरील त्रिलोकोत्तमपुरात विद्याधराचा राजा विद्युद्गति व राणी विद्युन्माला याच्या पोटीं अग्निवेग नामें करून जन्मला त्यानें खूप सुखोपभोग भोगल्यावर दीक्षा घेतली हरी नामक पर्वतातील गुहेत तो तपस्या करीत असता त्याच्या डोक्याला अजगराने वेटाळें घातले अर्थात् गिळिले

धूमप्रभाद्जगरीभूतेन द्विपता गत ।
पुष्करे शुक्तशर्मास्मादेत्यास्मिन्पद्मवर्षग ॥ १३ ॥

कुक्कुट नाग मरून धूमाभा नामक नरकात पडला तेथून तो अजगराचे जन्मास गेला त्याच अजगराने पूर्ववैर स्मरून अग्निवेग मुनीला आवळून ठार मारले तेथून तो जीव अच्युत स्वर्गातील पुष्कर विमानात देव झाला पुढे तो पश्चिम विदेह क्षेत्रात पद्म नामक देशातील अश्वपुरचा राजा वज्रवीर्य व राणी विजया याच्या पोटीं वज्रनाभि नावाने जन्मला

चक्री जैनित्वाश्वपुरे वज्रनाभिस्तपोऽभजत् ।
पद्मश्वभ्रात्कुरङ्गाख्यो भिल्लो भत्वाथकर्कशम् ॥१४॥

या वज्रनाभि चक्रवर्तीने वैभव भोगून खूप तप आचारिले कमठाचा जीव अजगर मेल्यावर साहव्या नरकात गेला व तेथून तो कुरंग नावाचा भिल्ल होऊन जन्मला तो फार क्रूर होता

१ धूम प्रभ अक्रातोऽन २ जम्बूद्वीपापरविदेहपद्माख्ये देशे ३ भूत्वा ४ भूरि यथा भवति घोरोपसर्गान्कृत्वा इत्यर्थ ।

**इतस्तेन सुभद्राख्यसे ग्रैवेयकेपञ्चमे।**
**शुक्लान्युतोऽभदानन्द ऐक्ष्वाकु कोशलेश्वर॰ ॥१५॥**

वज्रनाभि मुनि समाधिमरण मारून सुभद्र नामक मध्यम ग्रैवेयक विमानातील अहमिंद्र देव झाला तेथून तो जम्बुद्वीपात कोशलदेशातील अयोध्या नगरीचा इक्ष्वाकुवंशाचा राजा वज्रबाहु व राणी प्रभाकरी याच्या पोटी आनंद नाम करून जन्मला

**कुर्वन्नष्टाह्निके चैत्ये स स्वामिहितमन्त्रिण ।**
**वाचाभ्यर्च्य जिनेंद्रार्चा पप्रच्छ द्रष्टुमागतम् ॥१६॥**

एकदा त्याने सदाग्रह पक्षात चैत्यालयात अष्टाह्निक महोत्सव स्वामिहित नामक मंत्र्याच्या सल्ल्यानुसार केला तेव्हा तेथे दर्शना साठी आलेल्या मुनीना त्याने विचारले

**नत्वा विपुलमत्याख्य गणेश भगवन्फलम् ॥**
**अचेतना जिनेंद्रार्चा भर्चिता किं भवेदिति ॥ १७ ॥**

विपुलमति मुनींना नमस्कार करून तो म्हणाला, जिनेंद्राच्या अचेतन अशा मूर्तीच्या पूजन केले असता पूजकाना काय बरे फल मिळते ?

**सोऽवोचदचिदप्येषार्हन् सोत्पादजगता ग्रुवम् ॥**
**न वस्तुतत्परीणामप्रकर्षं पुण्यपुञ्जकृत् ॥ १८ ॥**

---

१ मध्यग्रैवेयकान्तिमध्यविमाने २ जिनगृहे ३ पूजयता भव्याना ४ गणेश ५ चेतनारहिताऽपि ६ सह उत्पादेन वर्तते जगति तेषां सोत्पादजगता वस्तुपदार्थ परिणामप्रकर्षं कृत्वा पुण्यपुञ्जकृत् किं न भवति अपि तु भवति।

तच्छ्रुत्वा शुद्धवृत्तेन विश्वार्हद्देहवर्णनम् ॥
प्रागर्यम्णि प्रतीयार्कबिम्बस्थजिनमन्दिरम् ॥ १९ ॥

ते ह्मणाले कीं अर्हबिंब जरी अचेतन असलें तरी उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवर परिणामाचा प्रकर्ष केला तर त पदार्थ पुण्य पुद्गलाचा स्कंध बनल्याशिवाय कसा राहील ? जिन बिंबानीच पुण्य पुद्गलाचा समुदाय भव्य जीवांना शुभ परिणाम उत्पन्न करण्यास निमित्त होतो जिनबिंबामुळें जिनमंदिरहि पवित्र ठरतें वगैरे उपदेश ऐकून त्या राजानें सूर्यविमानात असलल्या जिनमंदिराची भावपूजा केली

हैम सान्तर्जिनगृह कारयित्वार्कमण्डलम् ।
चक्रे महेज्यां सूर्यार्घालोकं विश्वजिनालयम् ॥२०॥

त्याने राजवाड्यामध्यें रत्नखचित सुवर्णाचें जिनालय बांधून यातील सूर्यविमानस्थ जिनबिंबाची महापूजा केला या महापूजा ह्मणजे चतुर्मुख पूजा, रथावर्तपूजा, सर्वतोभद्र पूजा वगैरे होत सूर्याला अर्घ्य दिल्यावर ज्यात जिनबिंबदर्शन केले जातें ती सूर्यार्घालोक पूजा त्यानें केली.

प्रत्यन्वह ददे लोक जिनेज्यायां युनक्ति च ।
तदाप्रभृति लोकेऽस्मिनजातमर्कोपसेवनम् ॥२१॥

तो राजा दररोज सूर्यार्घालोक पूजा करतो तें पाहून सर्व

१ सूर्यविमाने प्रतीत्य २ राजमंदिरमध्य ३ चतुर्मुखरथावर्तसर्वतोभद्राद्या ४ सूर्यार्पेण आत्मक अवलोकन यत्र ।

प्रजाजन सूर्याला अर्घ्य देऊ लागले व तेव्हापासून सूर्योपासना रूढ झाली

**समुद्रदत्तात्तवृत्त पलितात्सान्त्यनामभृत् ।**
**शयु श्वभ्रादेत्य सिंहीभूतेनानतमध्ययत् ॥२२॥**

बरीच वर्षे राज्यवैभव भोगीत असता डोईचा शुभ्र केस पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झाले व समुद्रदत्त मुनीजवळ त्यानें दीक्षा घेऊन पोडशभावनाचें चिंतन केले व तीर्थंकर नामकर्म बांधलें कमठाचा जीव नरकातून सिंहयोनींत जन्मला होता पूर्ववैर स्मरून त्याने ध्यानमग्न असता राजाला उपसर्ग केला व मरून तो आनत स्वर्गांतील प्राणत विमानात देव झाला.

**ततोऽत्रैत्य सकाशीशविश्वसेनतुजोऽभवत् ।**
**पोडशाब्दवया प्राप्तो वन श्वभ्रादुपेत्य तम् ॥२३॥**

तेथून तो जीव काशीचा राजा विश्वसेन व ब्राह्मीदेवी यांच्या पोटीं पार्श्वनाथ नावानें जन्मला सोळाव्या वर्षीं एकदा तो वनात गेला. कमठाचा जीव नरकातून निघून प्रभूच्या मातेचा बाप महीपाल राजा होऊन जन्माला आला

**महिपालाख्यात्ममाता महीभृत प्रियामृते**
**दीक्षित दारु भिन्दन्तमार्प्त तीव्रायितु जगौ ॥ २४ ॥**

१ गुरो २ अजगर ३ अधोह्रे स्म आनर्तेदोऽभूदित्यथ सिंहेन कृत्वा ४ आनतात् ५ ब्राह्मीदेव्या ६ कमठचर ७ प्राप्त स्वय इष्ट ८ पुन प्रदीपितु अग्नि ।

तच्छ्रुत्वा शुद्धवृत्तेन विश्वार्हद्देहवर्णनम् ॥
प्रागर्यम्णि प्रतीयार्कबिम्बस्थजिनमन्दिरम् ॥ १९ ॥

ते ह्मणाले कीं अर्हद्बिंब जरी अचेतन असलें तरी उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवर परिणामाचा प्रकर्ष केला तर तें पदार्थ पुण्य पुद्गलाचा स्कंध बनविल्याशिवाय कसा राहील ? जिन बिंबातील पुण्य पुद्गलाचा समुदाय भव्य जीवांना शुभ परिणाम उत्पन्न करण्यास निमित्त होतो जिनबिंबामुळें जिनमंदिरहि पवित्र ठरतें वगैरे उपदेश ऐकून त्या राजानें सूर्यविमानांत असलेल्या जिनमंदिराची भावपूजा केली

हैमं सान्तर्जिनगृहं कारयित्वार्कमण्डलम् ।
चक्रे महेज्यां सूर्यार्घालोकं विश्वजिनालयम् ॥२०॥

यानें राजवाड्यामध्यें रत्नखचित सुवर्णाचें जिनालय बांधून यांतील सूर्यविमानस्थ जिनबिंबाची महापूजा केली या महापूजा ह्मणजे चतुर्मुख पूजा, रथावर्तपूजा, सर्वतोभद्र पूजा वगैरे होत सूर्याला अर्घ्य दिल्यावर त्यांत जिनबिंबदर्शन केलें जातें ती सूर्यार्घालोक पूजा त्यानें केली

प्रत्यन्वहं ददे लोकं जिनेज्यायां युनक्ति च ।
तदाप्रभृति लोकेऽस्मिनजातमर्कोपसेवनम् ॥२१॥

तो राजा दररोज सूर्यार्घालोक पूजा करतो तें पाहून सर्व

१ सूर्यविमाने प्रतीत्य २ राजमंदिरमध्य ३ चतुर्मुखरथावर्तसर्वतोभद्राद्या ४ सूर्यार्घेण आगमक अवलोकन यत्र ।

प्रजाजन सूर्याला अर्घ्य देऊ लागले व तेव्हापासून सूर्योपासना रूढ झाली

समुद्रदत्तात्तवृत्त पलितात्सान्त्यनामभृत् ।
शयु श्वभ्रादेत्य सिंहीभूतेनानतमघ्ययत् ॥२२॥

बरीच वर्षे राज्यवैभव भोगीत असता डोईचा शुभ्र केस पाहून त्याला वैराग्य उत्पन्न झालें व समुद्रदत्त मुनीजवळ त्याने दीक्षा घेऊन षोडशभावनाचें चिंतन केलें व तीर्थंकर नामकर्म बांधलें कमठाचा जीव नरकातून सिंहयोनींत जन्मला होता पूर्ववैर स्मरून त्यान ध्यानमग्न असता राजाला उपसर्ग केला व मरून तो आनत स्वर्गांतील प्राणत विमानात देव झाला.

ततोऽत्येत्य सकाशीशाविश्वसेनतुजोऽभवत् ।
षोडशाब्दवया प्राप्तो वन श्वभ्रादुपेत्य तम् ॥२३॥

तेथून तो जीव काशीचा राजा विश्वसेन व ब्रह्मादेवी याच्या पोटीं पार्श्वनाथ नावानें जन्मला सोळाव्या वर्षीं एकदा तो वनात गेला. कमठाचा जीव नरकातून निघून प्रभूच्या मातेचा बाप महीपाल राजा होऊन जन्माला आला

महिपालाख्यात्ममाता महीभृत प्रियामृते
दीक्षित दारु भिन्दन्तमार्त तीर्थायितु जगौ ॥ २४ ॥

१ गुरो २ अजगर ३ अघाद्दे स्म आनतेदोऽमूदित्यथ सिंहेन कृत्वा ४ आनतात ५ ब्राह्मीदया ६ कमठचर ७ प्राप्त स्वय दृष्ट ८ पुन प्रदी पितु अग्नि ।

**सो नत्वा भोस्तपस्विन्मा साहिदृन्द्वमिदं भिदः ।**
**ततो तौनिरुधा तेन निन्ये तत्रासिपत्रैर्गौ ॥ २५ ॥**

महीपाल आयकोच्या मरणामुळे दु खी होऊन मिथ्या तपस्वी झाला त्याच वनात धुमा पेटवुन पचाग्नि मायन करीत बसला होता धुर्मीतील एका लाकडात सर्पयुगल होतें हे ओळखून पार्श्व-नाथानी असल ।हिंसात्मक तप करून काय फायदा असे विचारलें हा प्रश्न प्रभूनी नमस्कार न करताच विचारला होता त्या लाकडात सर्प युगल आहे आणि ते जळल्यामुळे तप कसे घडणार यामुळे तपस्वी रागावला त्यातल तो कमठाचा जीव पूर्व वर स्मरून अधिकच क्रुद्ध झाला व त्याने ते लाकूड कुऱ्हाडीने फोडल,

**छिन्नाभृता नागेन्द्रौ तत्रस्ताक्षररञ्जितौ ।**
**पद्मावती धरणकौ सुभौमस्तैर्न्यस्त सं ॥ २६ ॥**

त्यातून दोन तुकडे झालेले नागयुगल बाहेर पडले सुभौम कुमाराने तपस्व्याची खूप निर्भर्त्सना केली त्याने पच नमस्काराचा उपदेश दिल्याने नागयुगल धरणींद्र व पद्मावती झाले

**शिशद्वर्षात्ययेऽयोध्यापतिदूतान्निशम्य स ।**
**अयोध्या पुरुतं स्तुत्वाद्राग्भावनात्तरुयम ॥ २७ ॥**

---

१ नमस्कारकृत्वा २ दारुणि ३ परशुना छिन्नौ इत्यर्थ ४ इद्रधुमा रापरनाम ५ धिक्कारपूर्व अज्ञानाति मानश्रावमधानोऽसि त्वमित्यवाधयत् ६ जयसेननृप ७ श्रीवृषभनाथार्यदारभ्य अयोध्यागणन श्रुत्वा ८ पश्च अय मनस्तुता दूतन ।

पार्श्वनाथाच्या तिसाव्या वर्षी अयोध्याधिपति जयसेनानें घाडे वगैरे भेट देता वरोवर पाठविली असता अयोध्येत झालेल्या ऋषभादितीर्थं-कराचे वर्णनहि त्यानें केले ते ऐकून पार्श्वनाथकुमारांनी दीक्षा घेतली.

**विहृत्य चतुरो मासा- याच्छन्नस्थवेन स्थितः ।**
**सवरज्योतिषामर्त्यभूतेन खगमनक्षते ॥ २८ ॥**

चार महिने विहार करून ते दीक्षावनात ध्यानस्थ असता संवर नामक ज्योतिष्कदेवाने आपल्या विमानाला अटकळा होऊ लागल्या म्हणून उपद्रव केला

**दीप्तवरान्विना सौरिरूपसर्गस्पद्रुतः ।**
**द्विपो धरणपद्मारतव्यापाचि मा.केवल ॥ २९ ॥**

पूर्वजन्म आठवून याने पार्श्वनाथांना खूप दृष्टि करून उप-सर्ग केले कारण ता न कमठाचा जीव होता. पूर्वजन्मी आपला जीव गाचविल्याचे उपकार स्मरून धरणेंद्र व पद्मावती या नाग-देवतांनी त्यांच्यावर नागफणाछत्र धरून उपसर्ग दूर केले त्यावेळी चार घातिकर्मांचा पूर्ण क्षय होऊन त्यांना केवलज्ञान प्राप्त झाले

**धर्मामृतमयी वृष्टिं कृत्वा भव्येषु निर्वृतः ।**
**तं पार्श्वं तापदुन्दुत्तमायण पर्युपास्महे ॥ ३० ॥**

भव्यजीवांवर धर्मामृताची वृष्टि करून जे निर्वाणाला गेले त्या पार्श्वनाथांची आम्ही भ तापापासून तारणारा उपासना करतो

[१] जिदाल न २ अ काशे विमानस्खलनात् ३ दगवडे ४ एदरस्य गिकामरेण उपद्रुत ।

**मरूभूतिरशनिघोषःसाहस्रारोऽथ योऽग्निवेगोऽच्युतजः ।**
**वैत्रोऽहमिन्द्रआनन्द आनतेन्द्रो भजेऽथ पार्श्वजिनम् ॥३१**

मरुभूति, अशनिघोष, सहस्रारस्वर्गातील देव, विद्याधर, अच्युतस्वर्गातील देव, वज्रनाभिचक्रवर्ती, ग्रैवेयकात अहमिंद्रदेव, *आनंदराजा, आनत स्वर्गात देवेंद्र इतकी भवावली भोगून आलेल्या* पार्श्वनाथ तीर्थकराचे आम्ही भजन करतो

**कमठ कुक्कुटसर्प पञ्चमनरकी शयुस्तम क्षितिज ।**
**व्या गोऽधोगं.सिंहो नरकी नरपोऽथ सम्बर श्रितदृक् ॥३२**

कमठ, कुक्कुटसर्प, पाचव्या नरकातील जीव, अजगर, भिल्ल, सहाव्या नरकातला नारकीजीव, सिंह, नारकीजीव, महीपाल राजा इतके भव भोगून शेवटीं संवरदेव झाल्यावर तो जीव सम्यक्त्वधारी झाला

**इति श्रीपार्श्वनथस्य त्रयोविंशम् ॥ २३ ॥**

---

**सार्थेऽत्र पुष्कलावत्यां भिल्लास्ते मधुके वने ।**
**मुनिं सागरसेनाख्य भ्रमन्त दिग्विमोहत ॥ १ ॥**

जम्बूद्वीपात विदेहक्षेत्रात पुष्कलावती देशातील मधुकवनात पुरु [illegible] नावाचा भिल्ल राहात होता भिल्लानी व्यापाऱ्याचा तांडा इकडे तिकडे पळवला [illegible] एकदा सागरसेन नामक मुनि विहार करीत [illegible] [illegible] चुकून आले

[illegible] ४ श्रापाश्वनाथसमीवे [illegible] ६ पुष्कलावतीसवधिनि ।

हन्तुकामो मृग मत्वा व्याधराज पुरूरवा ।
इमे देवाश्चरन्तीति निषिद्धो निजभार्यया ॥ २ ॥

एखादें हरिण समजून मुनिस पुरवा भिल्लाने बाण मारला पण त्याच्या कालिका नामक भार्येनें त देव आहेत बाण मारू नका म्हणून त्याला रोकलें

शान्त्वा तत स मध्वादित्रयत्यागव्रत श्रित ।
गत्वा सौधर्ममत्याभून्मरीचाख्य सुतोऽग्रणी ॥ ३ ॥

मुनींची भेट झाल्यावर त्याना धर्मनाभ केला त्याचा त्याचें मनावर फार परिणाम होऊन त्यानें मधु त्याग केला. या व्रतामुळें तो मेल्यावर सौधर्म स्वर्गात देव झाला नेथून तो अयोध्येंत भरतराजाला अनतमति राणीपासून मरीचि नामे कल्न पुत्र जन्मला.

भरतेशानन्तमत्यो पुरुणासह दीक्षित ।
परीपहार्दितो गृह्णन्फलवल्कादि स स्वयम् ॥ ४ ॥

ऋषभदेवाबरोबर त्यानेहि दीक्षा घतला होती पण कठोर परिपह सहन न झाल्यामुळें तो स्वत फळें खाऊ लागला, व वल्कले नेसू लागला

नैर्ग्रन्थ्यनिन्त्यभेतत्त्यक्त्वेदं वेषान्तर श्रय ।
इत्यादिष्टो देवताभि पारिव्राजकतामगात् ॥ ५ ॥

---

१ कल्काख्यया २ शिखादिदकमडलुधारणादिलक्षण दाशा।

निर्ग्रंथपणाला ह्मणजे दिगंबरत्वाला हें आचारण निंदास्पद आहे ह्मणून तू वेषांतर कर असे देवतांनी सांगितल्यावर त्यानें परिव्राजक वेष धारण केला

तेनार्हतोऽपि सद्धर्म किं तु दर्पात्तमोहत् ।
तपोभि साङ्ख्यतत्वानि कपिलादीनजिग्रहत् ॥ ६ ॥

ऋषभतीर्थकरापासून दीक्षा घेतली असूनहि तो ते व्रत पाळू शकला नाहीं सद्धर्म सोडून त्यानें सांख्य नामक मिथ्यात्व-मत गर्वानें सुरू केलें व कपिलादि अनेक तपस्वी त्याचे शिष्य झाले.

एव ब्रह्मामर सोऽभूद्दिजोऽन्न जटिलोऽनैय ।
सौधर्मदेवो य पुष्पमित्रसौधर्मनाकतः ॥ ७ ॥

पुढें तो मेल्यानंतर पांचव्या स्वर्गांत देव झाला तेथून अयोध्या नगरींत कपिल ब्राह्मणास कालीपासून जटिल नामक पुत्र झाला तोहि एवकरच परिव्राजक बनला व मेल्यानंतर सौधर्म स्वर्गांत देव झाला नंतर स्थूणागार नगरींतील भारद्वाज ब्राह्मणास पुष्पदत्ता स्त्रीपासून तो पुष्पमित्र नावानें पुत्र जन्मला त्यानेंहि परि-व्राजक दीक्षा घेतली व मेल्यानंतर तो सौधर्म स्वर्गात देव झाला.

विप्रोऽथाग्निसह सानत्कुमारथाग्निमित्रक ।
ततो माहेन्द्रजो भूत्वा भारद्वाजोऽथ तद्भुज ॥ ८ ॥

१ आदिनाथमुपसद्य दर्पान्मोहोदयात्त सद्धर्म तेन सद्धर्मेण स्पर्द्धते स्म २ पूर्वं तस्य माहभित्त्वा ३ प्राप्यरहित मिथ्यादृष्टि ४ तद्भुज माहेंद्र स्वर्गज ।

तेथून तो सूतिका नगरींतील अग्निभूतिनामक ब्राह्मणास गौतमीपासून अग्निसह नावाने पुत्र झाला परिव्राजक दीक्षा घेऊन मेल्यावर तोहि सनत्कुमार स्वर्गात देव झाला पुढे मंदिर नगरातील गौतम ब्राह्मणास तो कौशाम्बीपासून अग्निमित्र नावाने झाला व परिव्राजक बनून मेल्यावर माहेंद्र स्वर्गात देव झाला पुढें त्याच नगरांत सालंकायन ब्राह्मणास मन्दिरा स्त्रीपासून भारद्वाज नामक पुत्र झाला त्रिदंडी दीक्षा घेऊन त्यानें उग्र तपश्चर्या केली मेल्यावर तो माहेंद्र स्वर्गात देव झाला.

ततस्त्रसस्थावरेषु सर्वेष्वश्रेषु चोत्कटम् ।
कष्टं स्थावरविप्र सन्माहेंद्र प्राप पूर्ववत् ॥ ९ ॥

नंतर त्या जातीने त्रस व स्थावर योनींत अनेक जन्म घेतल्यावर तो राजगृह नगरांत शांडिल्य ब्राह्मणास पाराशरीपासून स्थावर नावाने जन्मला परिव्राजक बनून मेल्यावर तोहि माहेंद्र स्वर्गात देव झाला

विश्वनन्द्यथ नार्पत्यो भूत्वा निर्ग्रन्थदीक्षया ।
महाशुक्रं गतोऽथाभूत्त्रिपृष्ठोऽथान्त्यनारकः ॥ १० ॥

पुन्हा मगधदेशांत राजगृहीचा राजा विश्वभूति व राणी जैनी याच्या पोटी विश्वनंदी नावाने जन्मला त्यानें दीक्षा घेतली व गायीचा धक्का लागून मेल्यावर महाशुक्रस्वर्गात वैमानिक

१ नृपति पुत्र

देव झाला तेथून तो पोदनपुरचा राजा प्रजापति व राणी मृगावती याच्या पोटी त्रिपृष्ट नावाने जन्मला

सोऽथ रिहोऽथ घामोऽत सिंहो योऽभूत्स जात्वदन् ।
कि-दिन्मृगमदप्रभ्य सहामितगुणेन खे ॥ ११ ॥
यतोजितञ्जयेनेन दृष्ट्वैव तीर्थनाथत' ।
स्मृत्वोपेत्य तमध्यास्य शिलामेवमुवाच स ॥ १२ ॥

त्रिपृष्ट अर्धचक्रवर्तीने बरेच वैभव भोगल्यावर मग्न तो सातव्या नरकात गला तेथून सिंहयोनीत जन्मला पुन्हा नरकात गेला व पुन्हा सिंह झाला तेंव्हे तो एकदा एक हरिण मारून खात असता अजितजय नामक चारण मुनि आले व त्यानी त्याच शिलेवर बसून त्यास धर्मबोध केला तेव्हा सिंहाला पूर्वभवाचे ज्ञान झाले

भो मृगेन्द्र ' त्रिपृष्ट सन्भुक्त्वा सौख्य विकर्मत ॥
प्राप्त श्वाभ्रञ्च यद्दु ख तन्न स्मरसि यत्पुनः ॥ १३ ॥

मुनि ह्मणाले, हे मृगेंद्रा, त्रिपृष्ट अर्धचक्रवर्तीच्या भवात पापकर्माने तू भोगलेले विषयसुख विसरलास काय ? त्या पापामुळे तुला नरकातील दु ख भोगावे लागले हेंहि विसरलास काय ?

दु खायाहश्च भो कुर्वन्नीदृ्यमार्ग्रपापभृत् ।
सद्यो जातिस्मरो भूत्वा तत्त्वश्रवणसीद्धया ॥ १४ ॥

१ गत्वा २ मि॰ प्रयुवाच ३ भवति भविष्यति

इतकें दु ख भोगले असूनहि तू पुहा पापोपार्जन करणारें असलें हें हिंसाकर्म का करीत आहेस ? मुनीच ह वचन ऐकून त्याला पूर्वभवाचें स्मरण झा ट व शुद्धबुद्धीने त्याने तत्त्वज्ञान ऐकलें.

वेपमानो ग्लद्वाष्प शुचा सा्भक्तदेग ट्क् ।
त्रिर्लेक्यैच शुभानेपीन्यांश्च स नति द्रुः ॥ १५ ॥

तत्वज्ञान ऐकून तो अश्रु टाळ लागला व त्याचे अग कापू लागल हें पाहून त्याचे शुभ इच्छिणारा मुनि त्याला पुहा म्हणाला

मुञ्च हींस महापाप भज शील जगन्हुतम् ।
जहीहि क्रोधमत्रुश्च क्षेम चेदाप्तुमिच्छसि ॥ १६ ॥

हे सुज सिंहा, तुला जर कल्याणाची इच्छा असे तर ह हिंसेचे महापाप सो ट जगद्वद्य उस शील धारण कर व क्रोधादि कषायरूपी शत्रुचा त्याग कर

ततो मुनीन्द्रवाक्यानि श्रुत्वा ध्यात्वा जिन हृदि ।
तत्त्वश्रद्धानमासाद्य सत्र कालादिलब्धित ॥ १७ ॥

मुनीचा उपदेश ऐकून व जिनेंद्राचे स्मरण व ध्यान करून त्या सिंहानें कालादिलब्धि प्राप्त करून सम्यक्त्व धारण केलें

प्रणिधाय मुहुश्चित्त श्रावकाणुव्रते सुधी ।
मृत्वा सौधर्मकल्पेऽसौ सिंहकेतु सुरोऽजनि ॥ १८ ॥

या सुज सिंहाने श्रावकाणुव्रतात मन स्थिर केल्यामुळे मरणा-नतर तो सौधर्म स्वर्गात सिंहकेतु नामक देव झाला

वीर व वर्धमान अशी त्याची दोन नावे ठेवली गेली जन्मा नतर त्याना पाहताच जयसेन व विजयनामक दोन चारण मुनींचे सशय दूर झाले

निवृत्तो जयसेनाभ्रचारिणा विजयेन च ।
तत्रैप सन्मतिर्देव इत्युक्त प्रमदादसौ ॥ २६ ॥

तेव्हा त्याना सन्मति असे नाव ठेऊन ते दोन्ने चारण मुनि आनदान परत गेले

वीर शूरेऽधुनेत्युक्ति सुराणामिन्द्रससदि ।
श्रुत्वा सङ्गमकोऽन्येत्युरागतस्त परीक्षितुम् ॥२७॥

महावीरच हल्ली खरा शूर आहे अशी चर्चा इद्रसभेत झाले-ली एकून सगम नामक कोणी देव त्याची परीक्षा करण्यासाठीं गेला

दृष्ट्वा क्रीडन्तमुद्यानेऽगमारूढो नृपात्मजैः ।
काकपक्षधरं सार्वं सवयोभिर्महाफणी ॥ २८ ॥

इतर राजकुमारासह वर्गीचातील झाडावर जावळ राखलेले राजपुत्रासह महावीर खेळत असलेले पाहून तो देव महासर्प बनला

भत्वा वेष्टितमास्कन्धादस्थौत्तद्भयतोऽखिला ।
विटपिभ्या निपत्याशु राजपुत्राःपलायिता ॥ २९ ॥

त्या महासर्पाने झाडाच्या बुध्याला विळखा घातलेला पाहून भ्यालेले राजकुमार फाद्यावरून उड्या मारून पळून गेले

१ गन २ हयात् ३ सुराणामुक्ति ४ वृक्ष ५ स्थित ६ सप ७ वृक्षात् ८ भूमौ पतित्वा ।

वीरोऽस्थादान्त भीष्म मात्रकैवटरीरमेत् ।
नत प्रीतो महावीर इत्याख्या तस्य संव्यधात् ॥३०॥
वीरजिन मात न पिता आईच्या मांडीवर खेळल्याप्रमाणे त्या सर्पावर खेळू लागले तेव्हा रूप होऊन संगम देवाने त्यांना महावीर म्हटलें व तो निघून गेला।

सोऽन्येद्युस्त्रिंशदब्दान्त स्मृतपूर्वभवान्तरः ।
सविधामुनिर्दीक्षितो धर्म्यमयगाई ॥ ३१ ॥
पुढे तीस वर्षे वयास आल्यावर महावीराना पूर्वभवाचे स्मरण झाले व वैराग्य आल्याने यांना दीक्षा घतली व धर्मध्यान चालविलें.

रुद्रो दुर्गानुगो रौद्र नाम्न श्मशानेऽतिमुक्तके ।
कदाचिन्मतिमायोगमाश्रितं वीक्ष्य दुष्टधीः ॥ ३२ ॥
विहार करीत करीत ते एकदा अतिमुक्तक स्मशानात जाऊन प्रतिमायोग धारण करून उभे असता दुर्गासह रुद्राने दुष्टपणा सुरू केला

योगाद्विसंचयितुं योगान्वेतालाहीन्द्रकुञ्जरान् ।
किरातसैन्यरूपाणि वाताग्न्यादींस्तथा निशि ॥३३॥
आपल्या योगमहात्म्यानें अंधेर पसरविला वेताल दानाना अकाळविकाळ रूप देऊन ताडवनृत्य करण्यास पाठविलें भयंकर सर्प, मदोन्मत्त हत्ती निर्माण केले अग्नि पेटविला सोसाट्याचा वारा सुरू केला प्रचंड किरात सैन्य आटले

१ मातुरूत्संग २ क्रीडयामास ३ संगमदेव ४ धर्म्यध्यानं ध्यायतिस्म ५ पावनासहित ।

एना वृषभसेनस्य श्रेष्ठस्यापि स्वयोषितः ॥
सोऽपि स्वकान्तसम्पर्कशङ्किनी शृङ्खलासिता ॥३७॥

शेठनें तिला आपल्या जानकोची दासी ह्मणून ठेवले पण शेठजीचा तिच्याशी समोग घडेल या भीतीने तिने चढ्नेला वेड्या वाढून केदेत ठेविले

शरावस्थसधान्याम्लजीर्णकोद्रवदिक्तया ॥
तामदापयदन्येद्युर्वीक्ष्य चर्यासमागतम् ॥ ३८ ॥

तिला ती मडक्यातन कोद्रवा भात पेजेतन खायाला देत असे एकदा त्याच गावी भिक्षासाठी महावीर आले

वीर प्रत्युद्गती भक्त्या सद्योगलितशृङ्खला ॥
दिव्यभूषाम्बरा केशन्द्युतपुष्पाश्चितक्षिति ॥ ३९ ॥

महावीर स्वामीचे भक्तीन स्वागत करीत असता तिच्या शृंखला तुटल्या तिची वस्त्रे दिव्य झाली केश सुशोभित झाले केसातन पुष्पे जमिनावर गळून ती सुंदर दिसू लागली

स्वीकृत्य शीलमाहात्म्याद्धेमीभतशरावगम् ॥
क्षीरशाल्योदनीभत तत्स्वमक्त्या भोजयत ॥४०॥

शीलमाहात्म्यामुळे मडके सोन्याचे झाले कोद्रवा भात खीर झाला व त्याचा स्वीकार महावीरांना केला

१ सायनाह भृत्यस । वृषभसेनाम्न २ भद्रा व्याधा अपयत् ३ भद्रा ४ बद्धा ५ अभ्युत्थित्य ती उद्यमपूर्वकम् श्री वीरसन्मुख गच्छता ६ विधिना प्रतिग्रह ॥

**पश्चाश्चर्याण्येत प्राप्य सयोगश्च स्वबन्धुभि ॥**
**निर्विद्यात्तव्रता साग्रगणिनीद्गाचिताभवत् ॥ ४१ ॥**

पाच आश्चय निर्माण झाली आप्तष्टाकडे ती गेली पण वैराग्य उत्पन्न होऊन तिनें अर्जिकेचा दीक्षा घेतना तेव्हा तिचा इद्रान पूजा केली

**छद्मस्थ स द्विषडब्दा रुजुकूलातटे स्थित. ।**
**शुक्लध्यानेन घातीनि निहत्याहन्त्यमासदत् ॥ ४२ ॥**

पुढे महावीर बारा वर्ष विहार करून ऋजुकूलानदी तीरीं शुक्लध्यानस्थ बसले असता त्याच्या चारा घातिकर्मांचा नाश झाला च ते अर्हत्पदाला गेले

**ज्ञात्वा दिव्यध्वनेर्हेतु तस्येन्द्रा वेदपारगम् ।**
**जात गोतमगोत्रेऽर्कविमानादेत्य गोतर्मत् ॥ ४३ ॥**

त्यावेळीं दिव्यध्वनि होण्याच कारण ओळखून इद्र गौतम गावीं विद्यापारगत गौतम गोत्राच्या इद्रभूमि नामक ब्राह्मणाकडे गेला इद्रभूति आदित्य विमानातील देवगतीतून तेथ जन्मता होता

**ग्रामादुपायेंना रिय सार्द्ध पञ्चशताद्विजे ।**
**तप नीत्वा त्रधित्रावधिन्द्रभूति गणाधिपम् ॥४४॥**

पाचश ब्राम्हणासह इद्रभूतीला त्या गावातून आणण्यात आलें

१ दानत् २ भाविनि भारतपात्रार भविष्यतील्यथ ३ छद्मस्थ भावनात्रिंशतव्दशरप ४ भगवत ५ पञ्चमस्वर्गात्‌ष्वविमानादागा ६ गातमनाम्न श्रेणिकमामात् ७ षट्पवेदादिप्रगन ।

त्यानें महावीरगना शंका विचारल्या व याच समाधान झाल्यामुळें त्यानें दीक्षा घेतली व पाप कर्माचा नाश करणारें तप आचरिलें तेव्हा तो इंद्रभूति गणधर झाला

किञ्चिदूनगरत्रिशङ्कुस्त्वार्हन्त्यपद पदम् ।
पर प्राप्तो महावीर स दिश्यान्नः पर पदम् ॥४५॥

तीस वर्षाना काहीं कमी दिवस अर्हत पद भोगून जे सिद्ध पदाला गेले ते महावीर आम्हालाहि श्रेष्ठ पद देवोत.

मद्यमासमधुत्यागात्सौधर्म स पुरूरवाः ।
ध्या मरीचिदिवीभूय षड्वारान्साङ्ख्यतो गत ॥४६

पुरूरवा भिल्ल मद्य, मास व मधाचें त्यागामुळें सौधर्मस्वर्गाप्रत गेला तेथून मरीचि होऊन देव झाला व सहा वेळा सांख्य मताचा ब्राम्हण झाला

ततस्त्रसस्थावरेषु क्लिष्ट्वा साङ्ख्यो द्विजोऽभवत् ।
स्वर्गत्वा विश्वनन्दी सन्नपि निर्ग्रन्थदीक्षया ॥ ४७ ॥

नतर अनेक त्रस व स्थावर योनींत जन्म घेऊन तो सांख्य मताचा ब्राम्हण झाला पुढे स्वर्गांतील देव होऊन विश्वनंदी झाला

त्रिपृष्ठोऽन्त्य वभ्रां हो धर्मभूय तत-श्वसन् ।
सिंहाऽथ श्रावकत्वेनाद्यकल्पेऽथ तत॰स्वग. ॥ ४८ ॥

नतर देवगतींत त्रिपृष्ठ झाला पुढे नरकगतींतून सिंह झाला व मग देव होऊन विद्याधर झाला

१ विद्यमान ।

लान्तव हरिषेण सन्महाशुक्रे ततोऽभवत् ॥
प्रियमित्र सहस्रार नन्द सन्नच्युतेन्द्रताम् ॥ ४९ ॥

देवगतीतून च्यवून हरिषेण झाला पुन्हा देव होऊन प्रियमित्र झाला नंतर सहस्रार स्वर्गात जाऊन नन्द झाला व मग अच्युत स्वर्गात इन्द्र झाला

ततश्च्युतो विरज्यात्तसंयम प्राप्य केवलम् ।
तीर्थकृद्व्य य सिद्धो महावीर नमामि तम् ॥ ५० ॥

तेथून च्यवून जो महावीर झाला व वैराग्य पावून दीक्षा घेतल्यावर तपाचरण करून ज्याला केवलज्ञान झाले व ज्याने धर्मतीर्थ प्रवर्तन करून सिद्धपद मिळविले त्याला मी नमन करतो

गणभृत्पूर्वधृत्सत्संयमावधिसत्त्विष ।
विक्रियर्द्धीश्वरास्तुर्यज्ञानिन स्वलक्षणा ॥ ५१ ॥
वादिनश्चार्यिका येषा श्राविका श्रावका गणे ।
देवादेव्यश्च तिर्यचस्तान्नुमस्तीर्थनायकान् ॥ ५२ ॥

गणधर, चौदापूर्वांचे धारक, सामान्यमुनि, अवधिज्ञानी, विक्रियाधारक मुनि मन पर्ययज्ञानी, केवलज्ञानी ज्यामध्ये आहे असा सघ व ज्याच्या सभेत वादपटु मुनि व आर्यिका श्रावक व श्राविका, देवदेवी व तिर्यच प्राणी आहेत त्या तीर्थकराना मी नमन करतो

इत्याशाधरदृब्धे त्रिषष्टिस्मृतिनाम्नि महापुराणतत्त्वसङ्ग्रहे श्रीमहावीरपुराण चतुर्विंशम् ॥

---

१ दीक्षक - सघ दिसेल

## ॥ अथ प्रशस्ति ॥

श्रीमानस्ति सपादलक्षविषय शाकम्भरीभूषणः ॥
तत्र श्रीरतिधाम मण्डलकर नामास्ति दुर्गं महत् ॥
श्रीरल्यामुदपादि तत्र विमलव्याघ्रेरवालान्वयो ॥
च्छ्रीमल्लक्षणतो जिनेन्द्रसमयश्रद्धालुराशाधरः ॥ १ ॥

धर्म, अर्थ व काम या तीही सपत्तींनी भरपूर असा[1] शाकंभरीभूषण सपादलक्ष नामक देश आहे त्या देशात रतिधाममंडलकर नामक मोठा किल्ला आहे तेथ शुद्ध अशा व्याघ्रेरवाल वंशाच्या श्रीमान् लक्षणशाहना भार्येच्या पोटीं जिनशासनानुरक्त असे आशाधर पंडित जन्माला आले

सरस्वत्यामिवात्मान सरस्वत्यामजीजनत् ॥
य पुन छाहड गुण्य रजितार्जुनभूपतिम् ॥ २ ॥

सरस्वतीच्या पोटी हा पंडित जसा आला तसा त्यानेंहि सरस्वतीनामक भार्येच्या पोटी छाहड नामक पुत्राला जन्म दिला ज्याने अर्जुनराजाला आपल्या गुणानी तृप्त केले

म्लेच्छेशेन सपादलक्षविषये व्याप्ते सुवृत्तक्षति ।
त्रासाद्विंध्यनरेन्द्रदो परिमलस्फूर्जी त्रिवर्गौजसि ॥
प्राप्तो मालवमण्डले बहुपरीवार पुरीमावसन ॥
यो धारामपठज्जिनप्रमितिशास्त्र महावीरत ॥३॥

* त्रिवर्गसपत्तियुक्त २ लक्षणशाह हे पितृनाम।

म्लेच्छराजाने सपादलक्षनामक देश पादाक्रांत केल्यावर उपजी-विकेला हरकत पोहोचल्यामुळे या त्रासाने विध्यनरेशाच्या आश्रयाखालील माळवदेशातल्या धारा नगरीत येऊन महावीरापासून जैनेंद्रव्या-करण व जैनन्याय या जिनशासनाचे वाचन करीत राहिले

श्रीमदर्जुनभूपालराज्ये श्रावकसंकुले ॥
जिनधर्मोदयार्थं यो नलकच्छपुरेऽवसत् ॥ ४ ॥

श्री अर्जुनदेवाच्या राज्यातील श्रावकवर्गांत जिनधर्माचा उदय करण्यासाठी ते नलकच्छपुरात राहिले

योद्राग्व्याकरणाब्धिपारमनयच्छुश्रूषमाणान्नकान ॥
षट्तर्कीपरमास्त्रमाप्य नयत प्रत्यर्थिनः कःक्षिपन ॥
चेरुः केऽस्खलितं न येन जिनवाग्दीप पथि ग्राहिताः ।
पीत्वा काव्यसुधा यतश्च रसिकेष्वापुः प्रतिष्ठां न के ॥

ज्यांनी कोणत्या विद्यार्थ्यांना व्याकरणरूपी समुद्राच्या पलीकडे नेले नाही बरे ? षट्तर्कीपरमअस्त्र त्यांच्याकडून लाभल्यामुळे कोणा प्रतिपक्षावर प्रहार केले नाहीत ? त्यांनी जिनवाणीचा दीप राजमार्गावर लावल्यामुळे कोण विनधोक मार्गी लागले नाहीत बरे ? त्यांची काव्यसुधा पिऊन रसिकामध्ये कोणी बरें प्रतिष्ठा मिळविली नाही

धर्मामृतादिशास्त्राणि कुशाग्रीयधियामिव ।
य सिद्धयन्महाकाव्य रसिकानां मुदेऽसृजन् ॥६॥

कुशाग्रबुद्धीचा धोतक धर्मामृतादि शास्त्र व रसिकांच्या प्रमादासाठी सिध्यका महाकाव्य त्यान रचिले

**सोऽहमाशाधरः कण्ठमलङ्कर्तुं सधर्मणाम् ।**
**पञ्जिकालङ्कृतं ग्रन्थमिमं पुण्यमरीरचम् ॥ ७ ॥**

त्या मी त्या आशाधर पंडितान धार्मिकांचे कंठ भूषित करण्यासाठी हा पावन ग्रंथ रचला

**क्वार्षगब्धि' क्व मद्धीस्तैस्तथाप्यनच्छूत मया ।**
**पुण्यैःसद्भ्यःकथारत्नान्युद्धृत्य ग्रथितान्यत ॥ ८ ॥**

आर्षग्रंथाचा सागर कोणीकडे व माझी अल्पबुद्धि कोणीकडे ! तथापि त्या पावनसागराचा मी स्पर्श केला व सज्जनांसाठी त्यातून कथारत्ने काढून मी त्याचे ग्रथन केले

**सङ्क्षिप्यतां पुराणानि नित्यस्वाध्यायसिद्धये ।**
**इति पण्डितजाजाकाद्विज्ञप्तिः प्रेरिकात्र मे ॥ ९ ॥**

नित्य स्वाध्यायासाठी त्रेसष्टशलाका पुरुषांचा पुराणे संक्षिप्त करून द्या अशी जाजाक पंडितांनी केलेली प्रेरणाच या ग्रंथाला कारण झाली

**यच्छद्मस्थतया किञ्चिदत्रास्तिस्वलितं मम ।**
**तत्संशोध्य पठन्त्वेनं जिनशासनभाक्तिकाः ॥ १० ॥**

जिनशासनभक्त चुकून जर माझ्या हातून काही स्खलन झाले असेल तर ते शुद्ध करून वाचोत

१ मम मतिः २ प्रसिद्धैः पुण्यैः ३ श्रेयोऽर्थिनामर्थे ४ शब्दार्थे वा प्रमाद

महापुराणान्तस्तत्त्वसङ्ग्रहं पठतामिमम् ।
त्रिषष्टिस्मृतिनामानं दृष्टिदेवी प्रसीदतु ॥ ११ ॥

त्रिषष्टिस्मृतिनामक महापुराणातील हा अंतर्गत तत्वसंग्रह वाचणाऱ्यावर सम्यग्दृष्टि देवता प्रसन्न होवो,

प्रमारवंशवार्धीन्दुदेवपालनृपात्मजे ।
श्रीमज्जैतुगिदेवेऽसिस्थेम्नावन्तीमवत्यलम् ॥ १२ ॥

परमार वंशरूपी समुद्राला वृद्धिंगत करण्यास चंद्राप्रमाणें असलेला जो देवपाल राजाचा पुत्र जो जैतुगिदेव तो आपल्या तरवारीच्या सामर्थ्याने अवंतीचे चांगले रक्षण करीत असता

नलकच्छपुरे श्रीमन्नेमिचैत्यालयेऽसिधत् ।
ग्रन्थोऽयं द्विनवद्वयेकविक्रमार्कसमात्यये ॥ १३ ॥

नलकच्छपुरातील नेमिनाथ मंदिरात हा ग्रंथ विक्रम संवत १२९२ मध्ये सिद्ध झाला

खाडिल्यवंश महणकमलश्रीः सुतः सदृक् ॥
धीनाकों वर्धतां येन लिखितास्यात्र पुस्तिका ॥१४

ज्याने ही पहिली प्रत लिहिली त्या खाडिल्यवंशांत महणकमल श्रीसुत धीनाकाची भरभराट होवो

अलमतिप्रसंगेन——आता विस्तार पुरे

१ त्रिषष्टिशलाकापुरुषपुराणार्थस्मरणाभ्यासात् २ सम्यक्त्वदेवता ३ विशदतया प्रसन्ने हृदि प्रसीदतु वा अभिमतार्थप्रदास्तु । ४ विक्रमसंवत्

शान्ति'शन्तनुता समस्तजगतां सङ्गच्छतां धामिकैः
श्रय श्रीपरिवर्द्धता नयधुराधुर्यो धरित्रीपति ॥
सद्विद्यारसमुद्गिरन्तु कवयो नामाप्ययस्यास्तु मा ॥
प्रार्थ्य वा कियदेक एव शिवकृद्धर्मो जयत्वर्हतः १५

सर्व जगात शातिनाथजिन शाति व कल्याणाची वृद्धि करोत धामिकाव़रोवर पुण्याची वृद्धि होवो न्यायनीतीत अग्रेसर असलेल्या पृथ्वीपतींच प्रभव वाढो कविजन सद्विद्येचा प्रसार करोत पाप नावालाहि कोठ न राहो दुसरे किती मागावे कल्याणकारक असा अर्हच्छासनाचा जयजयकार होवो

इत्याशाधरविरचिता त्रिषष्टिस्मृति समाप्ता ।

# माणिकचन्द-जैन-ग्रन्थमालामे प्रकाशित ग्रन्थोंकी सूची

१ लघीयस्त्रयादिसंग्रह |=)
२ सागारधर्मामृत सटीक ( अप्राप्य ) |≡)
३ विक्रान्तकौरव ( नाटक ) |=)
४ मैथिलीकल्याण ( ,, ) |)
५ पार्श्वनाथचरित ( काव्य ) ||)
६ आराधनासार सटीक |)||
७ जिनदत्तचरित ( अप्राप्य ) |)||
८ प्रद्युम्नचरित ( काव्य ) ||
९ चारित्रसार ( अप्राप्य ) |=)
१० प्रमाणनिर्णय ( अप्राप्य ) |-)
११ आचारसार ( अप्राप्य ) |=)
१२ त्रैलोक्यसार ( अप्राप्य ) १|||)
१३ तत्त्वानुशासनादिसंग्रह ( अप्राप्य ) |||=)
१४ अनगारधर्मामृत ( सटीक ) ३||)
१५ युक्त्यनुशासन |||-)
१६ नयचक्रसंग्रह |||≡)
१७ षट्प्राभृतादिसंग्रह-सटीक ३)
१८ प्रायश्चित्तसंग्रह
१९ मूलाचार सटीक पूर्वार्ध
२० भावसंग्रहादि
२१ सिद्धान्तसारादिसंग्रह
२२ नीतिवाक्यामृत ( सटीक ) १
२३ मूलाचार सटीक उत्तरार्ध
२४ रत्नकरण्डश्रावकाचार(सटीक)
२५ पंचसंग्रह
२६ लाटी संहिता
२७ पुरुदेवचम्पू
२८ जैनशिलालेखसंग्रह
२९ पद्मपुराण प्रथम खंड
३० ,, द्वितीय खंड
३१ ,, तृतीय खंड
३२ हरिवंशपुराण प्र०
३३ ,, द्वि०
३४ नीतिवाक्यामृत (परिशिष्ट)
३५ जम्बूस्वामीचरित
३७ आदिपुराण (पुष्पदन्त) लग०

**नोट**—ग्रन्थमालाके सब ग्रन्थ लागत मूल्यपर बेचे जाते हैं। इनकी जितनी अधिक बिक्री होगी, उतने ही अधिक ग्रन्थ प्रकाशित किये जा सकेंगे।

पत्रव्यवहार करनेका पता—

मन्त्री, माणिकचन्द जैनग्रन्थमाला
हीराबाग, गिरगाँव, बम्बई